**नागपूर शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेच्या सुधारीत प्रस्तावास मंजुरी प्रदान करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाक्षेस-२००४ / प्र.क्र. २६९ / रस्ते-८.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०१ ऑक्टोबर, २०१८.

वाचा

१) शासन निर्णय, क्र. पासूस - २०००/ प्र.क्र. २३/का.१४७४ (१), दि.२३.०२.२००१.
२) शासन निर्णय, क्र. खाक्षेस - २००२/ प्र.क्र. १०७ /रस्ते-९, दि.१३.१२.२००२.

**प्रस्तावना :-**

नियोजन विभागाच्या दि.२३.०२.२००१ रोजीच्या शासन निर्णयानुसार नागपूर शहरातील वाहतूक व्यवस्थेत सुधारणा करण्यासाठी अंदाजित किंमत रु. ३५०.०० कोटी खर्चाची रस्ते व पुलांची कामे "बांधा व हस्तांतरीत करा" या तत्वावर कार्यान्वित करण्यासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास "उद्योजक" म्हणून घोषित केले आहे. सदर प्रकल्पाकरीता खर्चाच्या वसुलीसाठी दि.१३.१२.२००२ रोजीच्या शासन निर्णयान्वये पाच ठिकाणी पथकर नाके उभारण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली. सदर प्रकल्पाचा सवलत कालावधी २९ वर्षे ठरविण्यात आला होता. सद्यस्थितीत प्रकल्पाची सुधारीत किंमत रु.५१७.३६ कोटी इतकी झालेली आहे. या रकमेची वसुली शासनाने मान्य केलेल्या २९ वर्षे इतक्या सवलत कालावधीत करता येणे शक्य नाही. तसेच महामंडळास सदर प्रकल्पाकरीता शासनाकडून अपेक्षित निधी प्राप्त झालेला नाही. यास्तव सदर प्रकल्पाच्या सुधारीत अंदाजीत किंमतीस व त्यातील समाविष्ट कामाच्या वावास तसेच प्राप्त न झालेला निधी महामंडळास देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याअनुषंगाने मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या दिनांक २३.०८.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत सदर बाबीस मान्यता देण्यात आलेली आहे. यानुसार आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नागपूर शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेची मुळ मंजुर रक्कम रु.३५०.०० कोटी इतकी असून, महामंडळाने प्रत्यक्षात केलेल्या कामाची सुधारीत रक्कम रु.५१७.३६ कोटी इतकी येत आहे. या अनुषंगाने सदर प्रकल्पास शासनाची खालीलप्रमाणे मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. नागपूर शहर एकात्मिक रस्ते विकास योजना रु. ५१७.३६ कोटीच्या सुधारीत अंदाजित किंमतीस तसेच त्यात समाविष्ट कामाच्या वावास मान्यता देण्यात येत आहे.
२. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने केलेल्या कामापोटी झालेला वाढीव खर्च एकूण रु.१६७.३६ कोटी व मुळ शासन निर्णयास अनुसरुन प्रलंबीत असलेले अनुदान रक्कम रु.१३८.४७ कोटी अशी एकूण रु.३०५.८३ कोटी रक्कम वित्त

विभागाकडून अंतिमत: प्रमाणित करुन अर्थसंकल्पिय तरतुद करुन महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास उपलब्ध करुन देण्यात यावी.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १०१/१४६१, दि. २८.०५.२०१८ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १०२/व्यय-११, दि. ३०.०३.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीसअनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००११७३६०५२४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Avinash Trimbakrao Dhondge

Digitally signed by Avinash Trimbakrao Dhondge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c027c83219049ab50c11c48a886d96688cd20f344566980536900a21e1d9a74b, serialNumber=4be0cd9a533d89e3ab5f3d01c44606657e57bbf30754f79095f947378c30d155, cn=Avinash Trimbakrao Dhondge
Date: 2018.10.01 17:39:58 +05'30'

**( अविनाश त्रिं.धोंडगे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत -**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
८) सर्व विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य.
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
१५) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०
१७) सर्व मंत्रालयीन विभाग
१८) निवड नस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय